मात्रणनाला लघु पाटबंधारे योजना , ता. रावेर जि. जळगांव या योजनेस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा- २०१३/(२९३/२०१३)/ लपा
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १३ जून २०१८

संदर्भ-

१) प्रशासकीय मान्यता शासन निर्णय क्रमांक लपायो१६/९/५२२/९५ खारभुमी मंत्रालय, मुंबई दि .३०/०५/१९९७
२) प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता कार्यकारी संचालक ,तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव निर्णय क्र. तापाविम/कासं/प्रवि-४/सुप्रमा/४४/लपायो २००२ दि. ०१/११/२००२
३) व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता शासन निर्णय क्र. लपात/ २००८/१३८८/ (४६६/२००८) खारभुमी मंत्रालय, मुंबई दि. १८/२/२००९
४) कार्यकारी संचालक , तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्र. जा. क्र. तापाविम/ प्रशा-५/ ५८१२/सन २०१३, दिनांक ०४/०९/२०१३
५) कार्यकारी संचालक , तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्र. जा. क्र. तापाविम/ प्रशा-५/ ५९९५/सन २०१६, दिनांक ०५/१२/२०१६
६) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे पत्र क्रमांक: १) व्यअस-२०१८/प्र.क्र.२७/अर्थसं-२ दिनांक -२७.०२.२०१८.

प्रस्तावना :

मात्रणनाला लघु पाटबंधारे योजना ,ता. रावेर, जि. जळगांव ही योजना रावेर तालुक्यातील लालमाती गावाजवळ असून योजनेचे सिंचन क्षेत्र ५११ हेक्टर आहे. या योजनेस सन १९९५-९६ च्या दरसूचीनुसार संदर्भ क्र. १ अन्वये रु. ३३१.२२ लक्ष इतक्या किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता, संदर्भ क्र. २ अन्वये सन २०००-२००१ चे दरसूचीवर आधारित रु. ७३४.७७ लक्ष किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता व सन २००८-०९ च्या दर सूचीवर आधारित संदर्भ क्र. ३ अन्वये रु. ११४७.५४ लक्ष इतक्या किंमतीस व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. संदर्भ क्र. ५ अन्वये प्रकल्पाचा तृतीय सुधारित प्रशासकिय मान्यता प्रस्ताव शेरे पुर्तता करुन शासनास पुनश्च सादर केलेला आहे. सदर योजनेवर डिसेंबर २०१४ अखेर पर्यंत रु. १३९९.८७ लक्ष एवढा खर्च झाला आहे. योजनेची घळभरणी सन २००५ मध्ये पूर्ण झालेली आहे.

बांधकाम दरम्यान योजनेच्या खर्चात झालेली दरसूचीतील वाढ, जादा दराची निविदा स्वीकृती, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, परिमाणातील वाढ व अंदाजपत्रकातील नविन तरतुदींमुळे झालेली वाढ व इतर कारणांमुळे झालेली वाढ इत्यादी मुळे योजनेस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे. त्यामुळे सदर प्रस्ताव हा व्यय अग्रक्रम समितीपुढे तृतीय सुधारित प्रशासकिय मान्यतेसाठी ठेवण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीने दि. १५.०२.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत यास मान्यता दिलेली आहे. यास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करणेत येत आहे.

**शासन निर्णय :**

१) आता या शासन निर्णयान्वये मात्रणनाला लघु पाटबंधारे योजना , ता. रावेर, जि. जळगांव, या योजनेस एकूण अंदाजित खर्च रुपये २२३६.१२ लक्ष (रु. दोन हजार दोनशे छत्तीस लक्ष बारा हजार फक्त) या किंमतीकरिता (कामासाठी एकूण रूपये २०८२.७४ लक्ष व अनुषंगीक खर्च रूपये १५३.३८ लक्ष ) तृतीय सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकात प्रत्यक्ष झालेला खर्च व उर्वरित कामासाठी सन २०१३-२०१४ वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशीर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्ट “अ” मध्ये जोडला आहे.

२) सदर तृतीय सुधारित प्रशासकिय मान्यता खालील अटींच्या अधिन राहूने देण्यात येत आहे.

२.१ सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्विती करण्याच्या विविध टप्प्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता असल्याचे गृहीत धरता येणार नाही.

२.२ या प्रकल्पाबाबत चालु असलेल्या अथवा प्रस्तावित विभागिय चौकशीची कार्यवाही पुढे चालु ठेवावी. प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

२.३ आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येऊ नये.

२.४ प्रगतीपथावरील निविदांची कामे प्रधान्याने पूर्ण करण्यात यावीत. पाणीसाठ्याचा सिंचनाकरीता जास्तीत जास्त लाभ होईल अशा प्रकारे उर्वरित कामांचा प्राधान्यक्रम निश्चित करण्यात यावा व त्यानुसार कामे/ निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

२.५ प्रकल्पाचे काम जून २०२१ पर्यंत पूर्ण करण्यात यावे.

३. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशिर्ष,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०- सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) सार्वजनिक व इतर क्षेत्रातील गुंतवणुका (००) (०३) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ४९२७)” या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १३१/१७/का-१४७१, दि.०३.०६.२०१७, तसेच वित्तविभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १९९/२०१७/व्यय-१२, दि.२८.०८.२०१७ अन्वये दिलेल्या

सहमतीनुसार व व्यय अग्रक्रम समितीने दि. १५/०२/२०१८ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर प्रकल्पाचे उर्वरित काम नियोजित वेळेत व तृतीय सुधारित प्रशासकिय तरतुदींच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली तृतीय सुधारित प्रशासकिय मान्यता या कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये १७९ अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१३१७२२०३६७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्र :- परिशीष्ट - अ

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.13 17:28:41 +05'30'

**( म.ई.धरणे )**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य.
३. सर्व मा. मंत्री /मा. राज्यमंत्री , महाराष्ट्र राज्य मंत्रालय मुंबई.
४. विरोधी पक्ष नेते विधान परिषद / विधानसभा
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
८. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
९. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव.
१०. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव.
११. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. जिल्हाधिकारी, जळगाव.
१३. अधीक्षक अभियंता जळगाव पाटबंधारे प्रकल्प मंडळ , जळगाव.
१४. अर्थशाखा १/२ जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१६. लपा , संग्रहार्थ.

परिशीष्ट- “अ”

**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा- २०१३/(२९३/२०१३)/ लपा मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.तारीख: १३/६/२०१८ चे परिशिष्ट**
**मात्रणनाला लघु पाटबंधारे योजना , ता. रावेर जि. जळगांव या योजनेस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता**
**.उपशिर्षनिहाय तरतूदी (रक्कम लक्ष रू)**

| अ.क्र. | तपशिल | तृतीय सु प्र.मा. |
|---|---|---|
| १ | अ- प्राथमिक | ०.५४ |
| २ | ब- जमीन | ५४८.८८ |
| ३ | क- कामे, धरण, सांडवा | ७५१.८० |
| ४ | डी- विमोचक | २६.८४ |
| ५ | के- इमारती | ७.१३ |
| ६ | एम- वृक्षारोपण | ५.०० |
| ७ | ओ- संकिर्ण | २०.१० |
| ८ | पी- परिरक्षण खर्च | १६.४३ |
| ९ | आर- दळणवळण | ३०.९६ |
| १० | मुख्य कालवा व वितरीका | ६७५.०६ |
| | **एकूण** | **२०८२.७४** |
| | अनुषंगिक खर्च | १५३.३८ |
| | **एकूण एकत्रित** | **२२३६.१२** |

(रु. दोन हजार दोनशे छत्तीस लक्ष बारा हजार फक्त)

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र ५११ हेक्टर आहे.
ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा ३४८२.०० स.घ.मी. आहे.
क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ५०६६७/-
ड) लाभव्यय गुणोत्तर २.०६ > १

Dharane Mallikarjun Irappa
Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.13 17:28:52 +05'30'

**( म.ई.धरणे )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन